**ग्रामिण रुग्णालय, कोंढाळी व पाटणसावंगी जि.नागपूर येथील प्रत्येकी १० अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
### सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः पदआ - २०२० /प्र.क्र.८ /आरोग्य-३

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
तारीख: १६ जानेवारी,२०२०.

**वाचा -**

**१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक -पदनि २०१८/प्र.क्र.१८५/आरोग्य -४, दिनांक - ०६.०६.२०१९.**

**२) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-संआसे/कक्ष-३/टे-१२/ग्रा.रु.कोंढाळी व पाटणसावंगी, जि.नागपूर/अपदे/सन २०१९-२०/१४६९५,१४६९८/१९, दिनांक-१६.१२.२०१९.**

**शासन निर्णय-**

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये कोंढाळी व पाटणसावंगी जि.नागपूर येथील ग्रामिण रुग्णालयासाठी २५ पदांची निर्मिती करण्यात आलेली आहे. त्यातील १० पदे नियमित असल्याने त्या अस्थायी पदांना मुदतवाढ देणे अत्यावश्यक आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार उपसंचालक आरोग्य सेवा, नागपूर मंडळ यांच्या अधिपत्याखालील ग्रामीण रुग्णालय, कोंढाळी व ग्रामीण रुग्णालय, पाटणसावंगी जि.नागपूर येथील प्रत्येकी १० अस्थायी पदे अश्या एकूण २० पदांना दि.०१.०९.२०१९ ते २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१९-२०२० या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-आर-१**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०६ - सार्वजनिक आरोग्य

००१ - संचालन व प्रशासन
००१ (०८) - प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रा.रु.इतका दर्जा वाढविणे. (२२१० ०४१३)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक - २१.०२.२०१९ व दिनांक- ११.०९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११६१५४०५५९२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.01.16 17:14:21 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये- राज्यस्तर), मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक,जिल्हा रुग्णालय, नागपूर.
८. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामिण रुग्णालय, कोंढाळी / पाटणसावंगी जि.नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१०. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
१२. निवडनस्ती (आरोग्य-३)

शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक-पदआ-२०२०/प्र.क्र.८/आरोग्य-३,
दिनांक- १६ जानेवारी, २०२० सोबतचे विवरणपत्र.

| अ.क्र. | पदनाम | वेतन स्तर | वेतन मॅट्रिक्स | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| १ | वैद्यकीय अधिक्षक | एस-२३ | ६७७००-२०८७०० | १ |
| २ | वैद्यकीय अधिकारी | एस-२० | ५६१००-१७७५०० | ३ |
| ३ | अधिपरिचारीका | एस-१३ | ३५४००-११२४०० | ३ |
| ४ | सहाय्यक अधिक्षक / भांडारपाल / कारभारी (गट- क) | एस-१३ | ३५४००-११२४०० | १ |
| ५ | औषध निर्माण अधिकारी | एस-१० | २९२००-९२३०० | १ |
| ६ | कनिष्ठ लिपिक (गट-क) | एस-०६ | १९९००-६३२०० | १ |
| **एकूण** | | | | **१०** |